अचलपूर नगर परिषदेद्वारा संचलित तंत्रनिकेतन महाविद्यालय शासनास हस्तांतरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- एमयुएन-२०१५/प्र.क्र.१४४/नवि-१८**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक - १६ मार्च, २०१७.**

**वाचा :-**

1) जिल्हाधिकारी यांचे क्र.कक्ष-२०/नविशा/तंत्र.नि./कावि-२१४/२०१५, दिनांक २३.०९.२०१५ चे पत्र.
2) अचलपूर नगरपरिषद सर्वसाधारण सभा ठराव क्र.३७, दिनांक ०४.०९.२०१५.
3) मुख्याधिकारी नगरपरिषद अचलपूर यांचे पत्र क्र.अनपा/तंत्र/१२२८०/२०१५, दिनांक १५.०९.२०१५.

**प्रस्तावना** :-

अचलपूर परिसरातील होतकरु तरुण तसेच मेळघाट परिसरातील विद्यार्थ्यांना कमी शुल्कामध्ये तांत्रिक शिक्षणाची सोय उपलब्ध व्हावी या उद्देशाने अचलपूर नगरपरिषदेद्वारा शैक्षणिक वर्ष १९८५-८६ मध्ये संचालक तंत्रशिक्षण महाराष्ट्र राज्य मुंबई यांच्या मान्यतेने तंत्रनिकेतन महाविद्यालय सुरु करण्यात आले.

०२. अचलपूर नगरपरिषदेमार्फत चालविण्यात येत असणाऱ्या तंत्र निकेतन महाविद्यालयातील विद्यार्थी संख्या कमी होत असल्याने तंत्रनिकेतन महाविद्यालयास प्राप्त होणाऱ्या शुल्कातून महाविद्यालय सुरळीतपणे चालू ठेवण्यासाठी तसेच शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्च तंत्रनिकेतन महाविद्यालयास त्यांच्या स्तरावरुन देणे शक्य होत नाही. नगर परिषदेला अधिव्याख्याते व कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्च करणे अशक्य झाल्यामुळे कर्मचाऱ्यांना वेळेवर वेतन देता आले नाही. त्यामुळे कर्मचाऱ्यांनी मा.उच्च न्यायालय नागपूर खंडपिठ येथे याचिका क्र.१८५७/२०१५ दाखल केली.

०३. मा.उच्च न्यायालयाने दि. ३०.०९.२०१५ रोजी राज्य शासनास संयुक्तिक निर्णय घेण्याचे आदेश पारीत केले. त्यानुसार (१) सदरचे तंत्रनिकेतन महाविद्यालय नगरपरिषदेने चालविणे (२) तंत्रनिकेतन महाविद्यालय बंद करणे (३) तंत्रनिकेतन महाविद्यालय राज्य शासनाने चालविणे हे तीन पर्याय उपलब्ध होते. या पर्यायापैकी नगरपरिषदेच्या कार्ये व कर्तव्यात तंत्रनिकेतन महाविद्यालय चालविणे अंतर्भूत नसल्याने नगरपरिषदेमार्फत सदरचे तंत्रनिकेतन महाविद्यालय चालविणे शक्य नाही. तसेच तंत्रनिकेतन महाविद्यालय बंद केल्यास अचलपूर परिसरातील विद्यार्थ्यांचे शैक्षणिक नुकसान होणार होते.

०४. नगर परिषद अचलपूर सर्वसाधारण सभा दिनांक ०४.०९.२०१५ ठराव क्र.३७ अन्वये सदरहू महाविद्यालय सध्या उपलब्ध असलेल्या सर्व साधन सामग्री व कर्मचाऱ्यांसह महाराष्ट्र शासनास कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्यास किंवा १०० टक्के शासनाद्वारे अनुदानित करण्यास मंजूरी प्रदान केलेली आहे. जिल्हाधिकारी यांनीही याबाबत दिनांक २६.१०.२०१५ च्या पत्रान्वये शिफारस केलेली आहे. सदर शिफारस व मा.उच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अनुषंगाने अचलपूर तंत्रनिकेतन महाविद्यालय हे संबंधित विभाग म्हणून उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे हस्तांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मा.मंत्रीमंडळाच्या दिनांक ०५.०३.२०१७ रोजी झालेल्या बैठकीतील निर्णयानुसार अचलपूर नगरपरिषद संचलित तंत्रनिकेतन महाविद्यालय शासनाच्या उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे हस्तांतरीत करण्यास या शासन निर्णयाद्वारे खालील अटींच्या अधिन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे.

**अ)** अचलपूर तंत्रनिकेतन महाविद्यालय हे महाविद्यालयाच्या १.१ हेक्टर जागेसह, त्यावरील इमारत बांधकाम व इमारतीतील साहित्यासह विनामोबदला उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे सर्व चल व अचल मालमत्तेसह कायमस्वरुपी हस्तांतरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**ब)** अचलपूर तंत्रनिकेतन महाविद्यालयातील विहित कार्यपध्दतीने नियुक्त व कार्यरत २५ शिक्षक तसेच २५ शिक्षकेतर कर्मचारी मिळून एकूण ५० कर्मचाऱ्यांचे समावेशन उच्च व तंत्र शिक्षण विभागाकडे करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**क)** हस्तांतरणाची तसेच शिक्षक व शिक्षकेतर कर्मचाऱ्यांच्या समावेशनाबाबतची कार्यवाही उच्च व तंत्र शिक्षण विभागाने ६ महिन्यात पुर्ण करावी. यापुर्वीचे थकित वेतन व दायित्वे व हस्तांतरणाचा निर्णय झाल्यापासून ६ महिन्यापर्यंतची वेतनाची अदायगी नगरपरिषदेने करण्यास व ६ महिन्यानंतर सदर तंत्रनिकेतन महाविद्यालयावरील वेतन व अन्य सर्व बाबींवरील संपुर्ण खर्च उच्च व तंत्र शिक्षण विभागामार्फत करण्यास व त्यासाठी आवश्यक ती अर्थसंकल्पीय तरतूद करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**ड)** हस्तांतरणाची कार्यवाही विहित वेळेत पुर्ण करण्यासाठी जिल्हा प्रशासन अधिकारी, अमरावती व उच्च तंत्र शिक्षण विभाग निर्देशित करेल असा "सह संचालक" दर्जापेक्षा कमी नसेल असा अधिकारी यांची द्विसदस्यीय समिती स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

हा शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक २५/तांशि-५, दिनांक ०३.१२.२०१६ तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४२/व्यय-५, दिनांक ११.०१.२०१७ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०३१६१५४८५१६९२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Anish Raman Parshurame

Digitally signed by Anish Raman Parshurame
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5ec58fef33f1b3244a3957d134f915dcb444ab495 3880ff670e5eca3d7a9f53b, cn=Anish Raman Parshurame
Date: 2017.03.16 16:04:33 +05'30'

**(अनिष परशुरामे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद संचालनालय, वरळी, मुंबई.
२) जिल्हाधिकारी, अमरावती
३) मुख्याधिकारी, नगरपरिषद अचलपूर, जि.अमरावती
४) अध्यक्ष, नगरपरिषद अचलपूर, जि.अमरावती.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल महोदयांचे सचिव, राजभवन, मुंबई -३२.
२) मा.मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२.
३) प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
४) प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
५) प्रधान सचिव (नवि २) यांचे वि.का.अ., नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) निवडनस्ती नवि-१८